# डाक्टर धाकजी भानजी सावंत यांचीं अत्युत्तम गुणदायक वनस्पतींचीं औषधें.

# DR. D. B. SAVANT'S SPECIFIC MEDICINES.

जे लोक आमच्या ह्या वनौषधींचा अनुभव घेतात, ते त्यांच्या अप्रतीम गुणामुळें थक्क होतात इतकेंच नव्हे तर त्याबद्दल इतरांजवळही तारीफ करतात; तेव्हां व्याधिग्रस्त गृहस्थांनीं दुसऱ्या जाहिरातींतील भपक्याकडे लक्ष न देतां व आपल्या पैशाची खराबी न करितां आमच्याकडील ह्या खऱ्या वनौषधींचाच उपयोग करून घेणें किती श्रेयस्कर आहे हें सांगणे नकोच.

## १ उपदंशारी रसायनरहित वनौषधी सार्सापरेला.

शरिराची उत्तम सुधारणा करणारीं अत्यंत महत्वाचीं जीं औषधें आहेत तीं सर्व या सार्सापरिल्यांत असल्यामुळें याचे अपूर्व गुण थोड्याच काळांत या देशाच्या सर्वभागीं व त्याच्या आसमंतांत अतिशय पसरले आहेत. यापासून खालीं लिहिलेले विकार अगदीं हटकून खात्रीनें साफ बरे होतात. याचा आम्हीं आज सतत ३० वर्षे साध्य व असाध्य अशा हजारों रोग्यांस देऊन अनुभव घेतला आहे. हा सेवन केल्यानें उपदंशजन्य व तत्संबंधीं खालीं लिहिलेले पांच प्रकारचे गरमीचे नवे व जुने (आंगीं भिनून गेलेले) विकार, १ वातोपदंश (तिडीक मारणें, स्फुरण येणें व कृष्णवर्णासारखे फोड येणें,) २ पित्तोपदंश (फोड पीतवर्ण असून ते चिघळणें व दाह होणें,) ३ कफोपदंश (कंडु, सूज व शुभ्रवर्णाचे दाट आणि मोठे मोठे पू व [illegible] स्रवणारे फोड येणें,) ४ सन्निपातोपदंश (नानाप्रकारचे ... व वेदना होणें,) ५ रक्तोपदंश (ईषतरक्त मिश्रित श्वेतवर्ण फोड, चट्टे, बद होणें इत्यादि,) परमा (तिडीक व ठणका लागणें,) लघवी लाल, गढूळ अथवा पिवळी असून त्यांतून धातू व खर पडणें, नेहमीं धातुस्राव होणें किंवा धातु पातळ होऊन पडणें, अति चेतना व त्वरित धातू पतन होणें किंवा स्खलन होणें, स्वप्नावस्था होणें, अनेक कारणानें अंगीं आलेली क्षीणता व अशक्तपणा, धातुक्षय, रक्तक्षय व क्षय, मुखरोग (वायुच्या कोपें करून ओंठ. कठीण व

कृष्णवर्ण होऊन वेदना होणें, ) दांत हालणें व दुखणें, हिरड्या फुगणें, सुजणें, मांस सडणें, वेदना होणें व त्यांतून पू व रक्त वाहणें, तोंडाची दुर्गंधी येणें, जिभेवर व घशांत पडलेले चट्टे, वात, पित्त, कफादि सर्व प्रकारचे विकारानें मस्तकांतील रक्त तप्त होऊन मेंदू बिघडणें, मज्जातंतूचें बळ कमी होणें, स्मरणशक्ती व बुद्धी मंद होणें व मस्तकांत मुंग्या चालल्या सारखा भास होणें, अर्धशिशी, मस्तकशूळ, पिनसरोग, नाकांतून पू व रक्त पडणें, कळी पडणें व दुर्गंधी येणें व सुगंधी न समजणें, कर्णरोग (बहिरेपणा, ) नेत्ररोग ( डोळ्यांस चिकटा व लाली येणें, पू व रक्तस्राव होणें, निद्राभंग होणें, व दृष्टी मंद होणें, ) कच्चा पारा किंवा कच्चें व पक्कें रसायन, सेवन केल्यानें व उपदंशजन्य विकारानें होणारे भयंकर रोग, रक्त बिघडून सर्वांगावर व हातांपायांवर फुटलेली गरमी, लाल, काळे, पांढरे, मध्यें गुल्माकृतीचे डाग व भगें ( महारोग व रक्तपिती, ) व्रण, गंडमाळा, नायटे, कंडु, खरुज, गळवें, हातांपायांची ममवा, अळवात, कडकी, जीर्णज्वर, संधीवायु, आर्धांगवायु, कुबजात्व-वायु, वात, पित्तवात, कफवात, ऊष्णवात, पोटशूळ, परिणामशूळ, अग्नीमांद्य, स्त्रियांचा बाळंतरोग व तत्संबंधीं विकार व संततीस अपायकारक जे गर्भस्त रोग इत्यादिकांचें त्वरित निवारण होऊन कांती, स्मरणशक्ती व बुद्धि वाढते. एक बाटली सेवन केल्यानें गुण येण्याचीं चिन्हें त्वरित नजरेस पडतात व घेणाराची खात्री होत जाते. उत्तम गुण येण्यास दोन बाटल्या ( विकार फार दि-वसांचा जुना नसेल तर ) पुरे होतील. रोग एक दोन वर्षांचा अ-सला तर हें औषध चार बाटल्या घेतलें पाहिजे. यापेक्षां जसजसा रोग जुनाट असेल त्याप्रमाणें हें औषध घेतलें पाहिजे. उपदंशज-न्यविकाराशिवाय कोणत्याही विकारानें आंगांतील रक्त बिघडतें त्यास हें औषध दोन बाटल्या घेतलें पाहिजे. शरीरपुष्ट, धातुपुष्ट, व धातुवृद्धी, रक्तशुद्धि व रक्तवृद्धि, वीर्यवृद्धि व निर्बलता दूर करणें असेल तर चार बाटल्या औषध घेतलें पाहिजे. एक बाटली पंधरा दिवस पुरते. बाटलीची किंमत १। रु. पोष्टांतून मागवि-ल्यास पोष्टेज खर्च १० आणे पडेल. २ बाटल्यांची किंमत २॥ रु.

शिवाय ट० ख० १२ आणे. ४ बाटल्यांस ४॥। रु. ट० ख० रु. १८= ६ बाटल्यांस ६॥। रु. ट० ख० १॥= रु. १२ बटल्यांस १२ रु. ट० ख० ३। रु. सार्सापरिल्याचें कमिशन मिळणार नाहीं; कारण अनुक्रमें किंमत कमी केली आहे. बाकीचे औषधांस शेंकडा १२॥ टक्के मिळेल.

सूचना—आमचीं औषधें रेलवे पार्सलानें मागवावयाचीं असतील तर त्यांची किंमत आगाऊ मनीआर्डर करून पाठवून दिली पाहिजे ह्मणजे सदहू औषधें पाठवून देऊं; रेलवे पार्सलास ४ आण्यापासून १२ बाटल्यांस १ रुपया पर्यंत खर्च येतो व तेणेंकरून मागविणाराचा फायदा होतो.

वि० सूचना:—हें औषध कोणत्याही ऋतूंत घेण्यास हरकत नाहीं; घेण्यास सुरवात केल्यावर पहिल्यानें थोडें पडसें, खोकला, कफ वगैरे होऊन सातवे दिवशीं रात्रौ थोडासा ज्वर येतो. हे सर्व विकार औषध सुरु ठेविलें असतां आपोआप बंद होतात; दुसरें औषध घेण्याची जरूर नाहीं. औषध सुरु करून वरील विकार झाले ह्मणजे रोग बरा होण्याचीं चिन्हें आहेत असें समजावें. ज्याची प्रकृति अशक्त असेल त्यानें वरील विकारापासून जास्त त्रास होतो असें वाटल्यास रात्रीं निजतवेळीं खडीसाखर दुधांत घालून दुध गरम करून गरम गरम घ्यावें. औषध सुरू केल्यापासून होणारे विकार आठवे दिवशीं आपोआप बंद झाल्यानंतर दुध, तुप, दहीं, ताक वगैरे पदार्थ हमेशा सेवन करावे, खुराक पौष्टीक असावेत.

घेण्याची रीती:—दिवसांतून दोन वेळां सकाळीं व संध्याकाळीं जेवणाचेपूर्वी ५ मिनीटें घ्यावें, नंतर थोडक्याच वेळानें जेवावें उशीर लाऊं नये, कारण हें घेतलें ह्मणजे भूक चांगली लागते. अग्नि प्रदिप्त होतो. मोठ्या मनुष्यास एक चमचा औषध व त्यांत चार चमचे थंड पाणी मिश्र करून द्यावें. ३ वर्षांचे मुलास १० थेंब, ५ वर्षांचे मुलास अर्धा चमचा व १० वर्षांचे मुलास पाऊण चमचा दुप्पट पाणी घालून द्यावें. चमचा बाटलीसोबत मिळेल. पथ्य:—उपदंशजन्य रोग, व्रण, पीनस, गंडमाळा, मुखरोग, ह्या रोगांवर तेल, तिखट, बटाटे, भुईमुग, वाल, वाटाणे, वांगीं इत्यादि वातूळ पदार्थ व मांसमच्छर, दारू, गांजा हीं सर्व वर्ज करावींत.

## महाकुष्ट व पांढरें कोड यांवर खालील दोन अत्युत्तम गुणदायक औषधें.

२ भारतमधुवल्लीः—खाण्यासाठीं किं. १। रु. ⎫ दोन बाटल्या मि.
३ नागवल्लीतेलः—लावण्यासाठीं किं. २ रु. ⎭ ट० ख० १२ आ.

ही मधुवल्ली सेवन केल्यानें व नागवल्ली तेल लाविल्यानें अठरा प्रकारचीं कुष्टें व महाकुष्टें, पांढरें कोड व लाल, काळें, किंचित तांबुस वर्णाचें व त्यांत पिंगट केश येतात तें, पांढरें असून रक्त वर्णाचें व गोलाकार स्रवणारें, पायांवर काळसर पुटकुळी उत्पन्न होऊन बहुत स्रवतें तें, सभोंवतीं अरक्त असून मध्यभागीं काळसरपणा, वेदनायुक्त व खर्खरित असतें तें, हातांपायांस भेगा पडून वेदना होतात तें, पांढरें असून किंचित् रक्त वर्ण व वरची त्वचा पातळ व चोळलें असतां मळासारिखें भुसकुट पडतें तें, आंतील भाग सुनभैरी, सभोंवतीं हात लावला असतां विंचू चावल्यासारखें होतें व ठणका मारतो, हातांपायांची व सर्व आंगाची आग होते ती, इत्यादि अठरा प्रकारचीं कुष्टें व पांडुरोग, ग्रंथी, श्वास, खोकला, कवलू वगैरे रोग बरे होऊन शरीर सदृढ होतें. **घेण्याची रीतीः**—दिवसांतून दोन वेळां, सकाळीं व संध्याकाळीं प्रत्येक वेळीं एक चमचा औषध ४ चमचे थंड पाण्यांत मिश्र करून घ्यावें. **नागवल्ली तेल लावण्याची रीतीः**—कुष्ट अगर कोड यावर दिवसांतून दोन वेळां चोळण्यासारख्या जाग्यावर चोळून लावावें व चोळण्यासारखें नसेल तर पिसानें लावावें. **पथ्य**—तेलकट, तिखट, हिंग, [illegible] वांगीं, वाटाणे, बटाटे इत्यादि वातुळ पदार्थ, मांसमच्छर, दारू, गांजा इत्यादि वर्ज करावींत. हें औषध घेऊं लागल्यापासून १५ दिवसांनीं गुण दिसूं लागतो व रोगाचे मानानें बरें होण्यास वर्ष सहा महिनें लागतात.

**४ क्षयहारक बब्बुलारिष्ठः**—हा सेवन केल्यानें क्षयरोग, उरतक्षय ( कफमिश्रित रक्त पडणें ) व तत्संबंधी विकार, कडकी, जळवात, जीर्णज्वर, पित्तवात व त्याच्या योगानें चक्कर येणें, हाता-

पायांचा व डोळ्यांचा दाह होणें, लघवींतून धातु व खर जाणें व अति चेतना होणें, खोकला, दमा इत्यादि रोग खात्रीनें बरे होतात. आणि खाल्लेलें अन्न पचन होतें. निद्रा चांगली लागते. शौच्यास साफ होतें व लघवी माफक, निवळ व थंड होते, परमा व स्त्रियांची लाल व सफेत धुपणी इत्यादि दूर होते. बाटलीची किंमत १। रु. ट० ख० १० आणे. एक बाटलींत गुण येतो. उत्तम गुणास दोन बाटल्या पाहिजेत. रोग फार जुनाट असल्यास उत्तम गुणास चार बाटल्या पाहिजेत. एकदम घेतल्यास किंमत ४॥ रु. ट० ख० १। रुपया. **घेण्याची रीतीः**—दिवसांतून तीनवेळां सकाळीं, दुपारीं व संध्याकाळीं; प्रत्येक वेळीं एक चमचाभर घ्यावें. **पथ्य**—तेल, चिंच, दहीं, ताक वर्ज करावें.

**८ प्रमेहहारक मंजिरीः**—सेवन केल्यानें दुर्घट परमा, नवा व जुना व तत्संबंधी विकार, तिडीक मारणें, [illegible] होणें, मूत्रमार्ग संकोच होणें, उन्हाळे होणें व स्त्रियांची लाल व सफेत धुपणी, इत्यादि विकार अमर्दी बिनचुक खात्रीनें त्वरित नाहींसे होतात. प्रत्येक बाटलीची किंमत १ रुपया. ट० ख० १० आणे. उत्तम गुणास दोन बाटल्या पाहिजेत. **घेण्याची रीतीः**—सकाळीं व संध्याकाळीं प्रत्येक वेळीं एक चमचाभर औषध त्यांत सुमारें ८ चमचे थंड पाणी घालून घेत जावें. **पथ्यः**—हिंग, वाल, वांगीं, बटाटे व फार ऊष्ण वर्ज करावें.

**९ नेत्ररोगांवर अत्युत्तम तेलः**—हें गुणकारक असून स्तुतीस अत्यंत पात्र आहे; हें सतत ३० वर्षांच्या पूर्ण अनुभवानें कळवितों. यानें डोळ्यांचे साधारण विकार तर सहजच, परंतु दृष्टीचा समूळ नाश करणारे देवी, गोंवर, उपदंशजन्य इत्यादि अनेक उष्णतेच्या योगानें आलेलें तिमिरांध्य, वडस, बिंदु, फुलें, सारा, गळति, खुपऱ्या, जळजळ, कंडु, फुटकुळ्या, चिकटा, ठणका, लाली इ. अनेक विकार तत्संबंधीं मस्तकशुलादि विकारांसह कितीही वयाच्या मनुष्यांस कोणत्याही कारणांनीं प्राप्त झालेले नवीन किंवा

जुनाट असले तरी नाजुक रीतीनें कोणतीही इजा बिलकुल न होतां बरे होतात. दृष्टि तीव्र व थंडगार राहते. शिवाय जागरण, उन्हांत फिरणें, अग्नीचा शेक, उपदंश विकार, अतिवाचन, अति व्यायाम, अति मैथून, अति मद्यपान, अत्युष्ण व विदाही पदार्थ भक्षण इत्यादि अनेक कारणांनीं ज्याचे डोळे बिघडतात, त्यांस याचा फारच मोठा उपयोग आहे; हें चांगल्या दृष्टीच्या मनुष्यांनीं डोळ्यांत घातल्यास वरील विकार त्यांस बिलकूल होणार नाहींत; हें अत्यंत उपयोगीं आहे कुपीची किंमत ८ आणे. ट० ख० ६ आणे. **हें तेल डोळ्यांत घालण्याची रीतीः**—दिवसांतून २ वेळां सकाळीं व संध्याकाळीं कुपील पेनानें अगर काडीनें ३ । ४ थेंब घालावे ५ मिनिटांनीं डोळ्यांस थंडावा येतो. झोंप चांगली लागते. **पथ्यः**—हिंग, दारू वर्ज.

**७ सुरसवल्लीचूर्णः**—हें सेवन केल्यानें हिंवज्वर, पित्तवातज्वर, कफवातज्वर, धातुगतज्वर, नेहमीं येणारे व पाळीनें येणारे ज्वर, कडकी, खोकला, दमा, मग ते कितीही हट्टी असोत तीन दिवसांत रामबाण गुण येतो. किंमत १२ आणे. ट० ख० ६ आणे. **हें चूर्ण घेण्याची रीतः**—दिवसांतून ३ वेळां सकाळीं, दोनप्रहरीं व संध्याकाळीं, प्रत्येक वेळीं पाव तोळा चूर्ण एक तोळा थंड पाण्यांत मिश्र करून घ्यावें. व हिंवज्वरास ऊन पाण्यांतून मिश्रकरून घ्यावें. नेहमी घेतल्यानें प्लेग लागु पडत नाहीं ३ वर्षांचा अनुभव पूर्ण आहे. **पथ्यः**—तेलकट, आंबट वर्ज करावें.

**८ मूळव्याधीहारक चूर्ण व मलमः**—मोड, रक्तस्राव, सूज, कातरे, दाह व ठणका हे विकार जुनें किंवा नवे कितीही दिवसांचे असले तरी अगदीं इजा न होतां बरे होतात. प्रथमदिवसापासून गुण दिसूं लागतो. व्याधिग्रस्तांनीं जरूर उपयोग करून घ्यावा. पोटांत घेण्यास व बाह्यांगास लावण्यास अशीं दोन औषधें दिलीं जातात. किं. २ रु. ट० हां० ६ आणे. **घेण्याची रीतीः**—सकाळीं व संध्याकाळीं जेवण्याच्या पूर्वीं प्रत्येकवेळीं पाव तोळा चूर्ण व (मोठा भारी असल्यास अर्धा तोळा) सुमारें दोन तोळे गोडें दहीं एकत्र करून घ्यावें. दहीं मानत

नसेल तर १ तोळा तूप व अर्धा तोळा खडीसाखर एकत्र करून घ्यावें. पथ्यः—हिंग, तिखट, ऊष्ण, दारू, गांजा इत्यादि वर्ज.

**मलम लावण्याची रीतिः**—दिवसांतून दोन वेळां शौचास जाऊन आल्यावर बोटानें मलम मलद्वारांत लावावें ह्मणजे जळजळ होणें व दाह, ठणका लागणें व मोड सलणें, चालण्यास व बसण्यास न मिळणें, रक्त पडणें, इत्यादि विकार, कितीही जुनाट असले तरी त्वरित दूर होतात.

**९ गजकर्णहारक मलमः**—गजकर्ण, नायटे, चोळ, इसब, शिब्वा, कंडु, खरूज, अंगावर उठलेला शहारा वगैरे त्वचेचे रोग हें मलम दोन वेळ लाविलांच आग न होतां थंडावा येऊन त्वचा विकारक कृमिसुद्धां साफ नाहींसे होतात. ह्याचा अनुभव पुष्कळांस आहेच; तरी वरील विकारांवर औषधें लाऊन ज्यांची निराशा झाली असेल त्यांनीं हें मलम जरूर लावावें. किंमत अनुक्रमें एक डबीस ४ आ. व २ आणे. ट० ख० ४ आणे.

**१० पाचकगोळ्याः**—ह्या सेवन केल्यानें बद्धकोष्ठवायु, नळवायु, पोटशुळ, पोटफुगी, संग्रहणी. कडकी, अग्नीमांद्य, करपट ढेंकर येणें, कंवर, मांड्या, पोटच्या दुःखणें, हे रोग त्वरीत दूर होतात. किंमत ८ आणे. ट० ख० ६ आणे. **घेण्याची रीतीः**—रात्रौ निजतेवेळीं १ किंवा २ गोळ्या, थंड पाण्यांत घ्याव्यात.

**११ मुखदंतादि रोगावर तेलः**—हें लाविल्यानें हिरड्या फुगणें, ठणका लागणें, भेगापडून पू व रक्त वाहणें, तालु, घसा व जिभेवरील चट्टे, हे रोग लवकर दूर होतात. किंमत ४ आणे. ट० ख० ६ आणे. **लावण्याची रीतीः**—दिवसांतून २ वेळां, कापसाच्या बोळयानें लावावें दांत किंवा हिरड्यांस सूज येऊन ठणकत असल्यास कापूस तेलांत भिजवून त्यावर ठेवावा.

**१२ कर्णस्त्रावादिकांवर तेलः**—हें कानांत घातल्यानें पू, पाणि, रक्त वाहणें, कृमी, कर्णनाद, कर्णशूळ, बहिरेपणा, इत्यादि अनेक रोग दूर होतात. किंमत ४ आणे. टपाल खर्च ६ आणे.

**कानांत तेल घालण्याची रीतीः**—दिवसांतून २ वेळां ५–६

थेंब घालून अर्ध्या तासानें काढून टाकावें.

**१३ भृंगीराज तेल:**–हें मस्तकास चोळल्यानें केस पिकत नाहींत. गेलेले केस पुन्हां येऊन पिकलेले काळेभोर होतात. हरएक प्रकारची मस्तकीं चढलेली गरमी दूर होऊन डोळ्यांस थंडावा येऊन मेंदू थंड राहून झोंप चांगली येते. हें तेल निजतेवेळीं मस्तकास ५।६ मिनीटें चोळावें, त्वरित गुण येतो. किंमत ४ आ. ट० ख० १ ०आणे.

## १४ वीर्यवर्धक, निर्बळताहारक, अशुद्धरक्तनाशक, शुद्धरक्तवर्धक, कामोद्दीपक, शरीरतेजदायक, मनोत्साहक, सुवर्णमिश्रित, अमोल्यवनस्पतीं पासून बनविलेल्या अवर्णनीय धातुवर्धक (रसायनरहित) गोळ्या.

आजपर्यंत जीं अशा प्रकारचीं हजारों औषधें निघालीं आहेत, त्यांत वर लिहिल्या प्रमाणें आंगीं खरोखर पूर्णपणें गुण येण्यास ह्या गोळ्या पहिल्याप्रतीच्या आहेत असें (बऱ्याच लोकांस देऊन अनुभविल्यावरून) ह्मणण्यास आतां मुळींच प्रत्यवाय वाटत नाहीं. ह्या गोळ्या, आह्मी बरेच दिवस शोध करून दुर्मिळ व अमोल्य अशा वनस्पती मिळवून त्यापासून बनविल्यामुळें, तशांत पूर्ण अनुभवून पाहिल्यामुळें ह्यांस "उत्तम गुणकारी" अशी संज्ञा देण्यास काय हरकत आहे? ह्या अनुपानपूर्वक सेवन केल्यानें, हरएक कारणानें आलेली अशक्तता, इंद्रियांची शिथिलता, नपुंसकत्व, आंगीं खिळून गेलेला जीर्णज्वर, कडकी, डोक्याचे त्रासदायक विकार, स्वप्नावस्था होणें, अग्नीमंद होणें, (भूक न लागणें) पित्तवातज्वर, कफगतज्वर, वरचेवर येणारे ज्वर, धातुस्थानची ऊष्णता, लघवींतून धातू जात गेल्यामुळें आलेली ग्लानी, गरमीचे आंगीं भिनुन गेलेले दुष्ट विकार, मूत्ररोग व तोंडाची अरूची, दुर्गंधीयेणें, मुळव्याधीव्यथा, मस्तकशूळ, छातींतील विकार, कफविकार, क्षय, दमा, श्वास, कास, (किंचित् श्रमानें दम लागणें, वरचेवर खोकला येणें) घेरी येणें, हातपाय इत्यादि सर्वांगाचा दाह होणें, ठणका लागणें, निद्राभंग होणें, स्त्रियांचे बाळंतरोग, धुपणी व संततीस अपायकारक गर्भाशयस्थरोग

इत्यादि विकार कितीही जुनाट असोत, ते ह्या गोळ्या सेवन केल्यानें साफ नाहींसे होऊन रक्तशुद्धी व रक्तवृद्धी होते. कामधंदा करण्यास जिवास उत्साह वाटतो. शरीरकांती प्रफुल्लीत होते. दुध, जडान्न उत्तम रीतीनें पचूं लागतें. ह्या गोळ्या लहान मुलांपासून तों उतार वयाच्या मनुष्यांपर्यंत सर्वांस सारख्या उपयोगीं पडत असून सर्व प्रदेशांत-सर्व ऋतूंत सारखा गुण दाखवितात. हा ह्या गोळ्यांचा अजब चमत्कार आहे. तरी इकडे सर्वत्रांनीं लक्ष्य देऊन ह्या अपोलिक गोळ्यांचा उपयोग करून घ्यावा; व ह्यांचे उत्तम गुणकारित्वाविषयीं आपली खात्री करून आपल्या इष्टमित्र मंडळींतही यांचा फैलावा करावा अशी अत्याग्रहपूर्वक सर्वांस विनंती आहे. तसेंच, ह्या गोळ्यांचा श्रीमंतांपासून तों गरिबांपर्यंत सर्वांस उपयोग करून घेतां यावा व ह्या अमोल्य व अमूल्य गोळ्यांचा सर्वत्र प्रसार व्हावा, ह्मणून फायद्याकडे लक्ष न देतां, किंमत ३२ गोळ्यांस १ रुपया. ७० गोळ्यांस २ रु. १६० गो० ४ रु. २६० गो० ६ रु. ५२० गो० १० रु. ठेविली आहे. शिवाय ट० ख० ६ आणे जास्त पडेल. ह्या गोळ्या सकाळीं व संध्याकाळीं दुधांत किंवा मधांत एक एक गोळी घ्यावी व वर पावशेर दुध गरम करून त्यांत खडीसाखर घालून घ्यावें. खुराक पौष्टिक असावा.

**१५ लवांकुशः**—हा सेवन केल्यानें जीर्णज्वर, क्षय, अपस्मार (फेंपरें,) भ्रम, धातुची क्षिणता, अशक्तपणा, दमा, खोकला, इ० रोग दूर होतात. एका डबीची किंमत १। रु. ट० ख० ६ आणे.

**घेण्याची रीतीः**—दिवसांतून दोन वेळा घ्यावें. प्रत्येक वेळीं चूर्ण दिड मासा (अथवा दोन आणे भार) व खडीसाखर पाव तोळा, हीं मिश्र करून खावीं आणि वर पावशेर दुधांत खडीसाखर घालून गरम करून घ्यावें.

**पथ्यः**—तेल, तिखट, आंबट व फार वावडे पदार्थ वर्ज करावेत.

**१६ सीतोळीः**—हें सेवन केल्यानें खोकला, क्षयरोग, हातापायांचा दाह होतो तो, जळवात, अग्नीमांद्य, जीभ शुन्य पडते ती, पाठीचा, कंबरेचा आणि कुशींतील शूळ, कडकी, मस्तकादिकांत रक्तविकार होतो तो व पित्तविकार हे रोग दुर होतात. डबीची

किंमत १। रु. ट० ख० ६ आणे.

**घेण्याची रीतीः**—दिवसांतून दोन वेळा; सकाळीं व संध्याकाळीं चूर्ण दीड मासा, मध सुमारें संध्येची एक पळी, खडीसाखर पाव तोळा, तुप एक तोळा, याप्रमाणें प्रत्येक वेळीं एकत्र करून घ्यावें. तेलकट, आंबट वर्ज करावें. व रात्रौ पावशेर दुधांत खडीसाखर अर्धा तोळा घालून गरम करून घ्यावें. खुराक पौष्टिक असावा.

**१७ तालीकादि चूर्णः**—हें सेवन केल्यानें खोकला, दमा, कडकी, वांती, अतिसार, पोटफुगी, नळवायु, पोटशूळ, कौलु, संग्रहणी, सोस, पंडूरोग इत्यादि रोग दूर होतात. किंमत १। रु ट० ख० ६ आणे.

**घेण्याची रीतीः**—सकाळीं व संध्याकाळीं प्रत्येक वेळीं पाव तोळा औषध मधांत मिळवून घ्यावें. **पथ्यः**— वावडें, तेलकट, आंबट वर्ज.

**१८ वृद्धगंधारीः**—सेवन केल्यानें सर्वातिसार (हगवण भसरे) संग्रहणी इत्यादि दूर होतात. डबीची किंमत १। रु ट० ख० ६ आ.

**घेण्याची रीतीः**—सकाळीं, दोनप्रहरीं व सायंकाळीं प्रत्येक वेळीं पावतोळा चूर्ण; पांच थेंब मध व अडीच तोळे तांदळाचें धुवण हीं एकत्र करून घ्यावें. **पथ्यः**—तेल, तिखट, उष्ण, वावडें, वातुळ व जडान्न इत्यादि वर्ज करावें.

**१९ द्राक्षागुटिकाः**—सेवन केल्यानें मलशुद्धी व मलमिश्रीत वायु, अम्लपीत्त, पित्तवायु, हवलदीलवायु हे रोग दूर होतात. डबीची किंमत १। रु ट० ख० ६ आणे. **घेण्याची रीतीः**—प्रत्येक वेळीं एक गोळी पाण्याबरोबर घेणे. याप्रमाणें दिवसांतून दोन वेळां घेणें. **पथ्यः**—तेल, तिखट, वावडें वर्ज करावें.

**२० गुलबुः**—सेवन केल्यानें उपदंशजन्य गरमी पांच प्रकारची व परमा वीस प्रकारचा व तत्संबंधी विकार, बद, चट्टे, तंतुमेह, परमा, लघवींतील दाह व ठणका, जळजळ, संधिवायु, कडकी, कास, श्वास, क्षीणशक्ती हे विकार थोड्याच दिवसांत दूर होतात. डबीची किंमत १। रु ट० ख० ६ आणे. **घेण्याची रीतीः**—

दिवसांतून २ वेळा; सकाळीं व संध्यांकाळीं प्रत्येक वेळीं पाव तोळा औषध, १ तोळा तूप, ५ थेंब मध, १ तोळा खडीसाखर हीं एकत्र करून घ्यावी. **पथ्य:**—भात, तुरीचें व मुगाचें वरण, गव्हांची पोळी, तूप, दुध, खडीसाखर, सैंधव, भाज्या—तोंडलें भेंड्या, दोडकीं (शिरोळीं,) आलें, उष्ण उदक, मेथीची भाजी, एवढें सेवन करावें.

**२१. बाळंतरोगावर औषध:**—हें सेवन केल्यानें बाळंतरोग व तत्संबंधीं विकार, आंग मोडणें, ज्वर, वात, कफज्वर, पिपसा (शोष), आंगास जडपणा, सुज, शूळ, बस्तीशूळ, अतिसार, कास, श्वास, मूर्च्छा, कंपवायु, मस्तकपीडा, हातांपायांस सुज, शैत्य, भ्रमीष्टपणा, चक्कर येणें, अरुची इत्यादि रोग दूर होतात. **घेण्याची रीती:**—दिवसांतुन ३ वेळां प्रत्येक वेळीं एकेक गोळी घ्यावी व वर दुधांत खडीसाखर अर्धा तोळा घालून गरम करून घ्यावें. **पथ्य:**—तेल, तिखट, आंबट, जडान्न, वावडें वर्ज करावें.

**२२. बाळरोगहारक गुटिका:**—ह्या सेवन केल्यानें लहान मुलांचे रोग व तत्संबंधी विकार, वात्तज, पित्तज, कफज, कंठाचा स्वर क्षीण होणें, शरीर कृश, मल, मूत्र व अपान वायू बंद होणें, आंगास फार घाम येणें, मळाच्या शितड्या होणें, डोळ्यांस कावीळ, वारंवार तहान लागणें, सर्व हातापायांची तप्तता असणें, तोंडांतून लाळ गळणें, निद्रा फार येणें, आंग जड असून तोंड व डोळे सुजीर असणें, वांती, जीर्णज्वर, भ्रम, झांपड, मुर्च्छा, ग्लानी, मस्तक तप्त असणें, क्षीणशक्ती, खोकला, शोक, डचकून रडत उठणें; इत्यादि रोग दूर होतात. व मुलें शरीरानें सशक्त आणि बळकट होतात. किंमत १। रु. ट० ख०६ आणे. **घेण्याची रीती:**—दिवसांतून दोन वेळां सकाळीं व संध्याकाळीं ६ महिन्यांच्या मुलांस अर्धी गोळी, १ वर्षाच्या मुलांस १ गोळी व ५ वर्षांच्या मुलांस २ गोळ्या प्रत्येक वेळीं दुधांतून किंवा मधांतून द्याव्या पुढें हेच नियम ७ वर्षांच्या मुलांपर्यंत चालू.

**२३. बृहत्सुवटिका:**—सेवन केल्यानें वात, कफापासून उत्पन्न झालेली जी संग्रहणी ती श्वास, खोकला, क्षयरोग, पोटांत डावीकडे कवळू रोग होतो तो, श्लीपदरोग, सुज, उचकी, भगंदर, केंस पांढरे

होतात ते पलीतरोग इत्यादि रोग दूर होतात. ह्या गोळ्या सेवन केल्यानें स्त्रीगमनाविषयीं इच्छा देतात, बुद्धी देतात व शरीराची जग दूर करितात, शक्ती वाढते, अग्नी प्रदिप्त होते. ४९ गोळ्यांची किंमत १। रु. ट० ख० ६ आणे. घेण्याची रीतः–दिवसांतून तीन वेळां सकाळीं, दुपारीं व संध्याकाळीं प्रत्येक वेळीं एक गोळी थंड पाण्याबरोबर गिळावी. खुराक पौष्टिक असावे.
पथ्यः–तेल, तिखट, वावडें, फार उष्ण पदार्थ वर्ज करावे.

२४. मूदरगुटिकाः–ह्या सेवन केल्यानें अतिसार, आंव व रक्त, तिडीक मारून मुरडा करणें, निद्रा न लागणे इत्यादि विकार बिनचूक खात्रीनें बरे होतात. किंमत १। रु. ट० ख० ६ आणे. घेण्याची रीतः–दिवसांतून ३ वेळां प्रत्येक वेळीं १ गोळी, गोडें दहीं २ तोळे आवळीचा ओला पाला बारीक वाटून सुमारें पाव तो. हीं एकत्र करून द्यावीं. पथ्यः–वावडें, उष्ण पदार्थ वर्ज करावे.

२५. खोकल्यावर गुटिकाः–ही तोंडांत धरून थोडा थोडा रस गिळीत गेल्यानें सुका खोकला व ठसका बंद होतो, कफ सुटून अवाज सुटतो. डबीची किं. ८ आणे. ट० ख० ६ आणे.

२६. पिंड तेलः–हें हातांपायांस व सर्व आंगास चोळल्यानें वातरक्त, जळवात, उष्णवात व सर्वांगाची तप्तता दूर होते, किंमत ८ आणे. ट० ख० १० आणे.

२७. कालेरा रोगावर गोळ्याः–ही गोळी सदरील पैकीं उपद्रव होतांच लिंबाच्या रसांतून किंवा थंड पाण्याबरोबर दिली असतां १–२ गोळ्यांतच उत्तम गूण येतो. किं. १२ आणे. ट० ख० ६ आणे. घेण्याची रीतः– १ गोळी व अर्धा तोळा खाव्या लिंबाचा रस मिश्र करून घ्यावी; वांती नसल्यास थंड पाण्यांत घ्यावी; ही घेतली असतां झाडा व लघवी बंद होऊन जें पोट चढतें तें चढत नाहीं व अग्नी प्रदीप्त होऊन रोगी हुशार होतो.

२८ शंकेश्वरः–सेवन केल्यानें कावीळ रोगानें डोळ्यांचा व सर्वांगाचा पिवळटपणा बरा होऊन कवळू, गुल्म, शैत्य, शूळ इत्यादि रोग दूर होतात. किं० १२ आणे. टपाल ख० ६ आणे.

घेण्याची रीतः—कावीळीस दिवसांतून २ वेळां प्रत्येक वेळीं १॥ मासा २ तोळे गोड दह्यांतून द्यावें. आवंतर रोगांस आल्याचा रस पाव तोळा. मध ५ थेंब द्यावी पथ्यः—तेलकट, तिखट, वावडें वर्ज.

२९ अनंदभैरवः—घेण्याचें प्रमाणः—कास, स्वास, अजीर्ण यांस मध व आल्याच्या रसांत; अतिसार, प्रमेह यांस लिंबाच्या रसांत; सर्पदंश, वृश्चिकदंश, यांस भारंगिची साल अथवा पाल्या-बरोबर प्रत्येक वेळीं १ गोळी दिवसांतून ३ वेळा घेणें. किंमत १ तोळ्यास २ रु. ट० ख० ४ आणे. पथ्यः—तेलकट वर्ज.

३० सुवर्णमाक्षीकः—नेत्ररोग, प्रमेह, शिरोरोग, आणि क्षय. किंमत १ तोळ्या. २ रु. ट० ख० ४ आणे. घेण्याची रीतः— प्रत्येक वेळीं औषध १ मासा व गाईचें दुध २ तोळे, खडीसाखर अर्धा तोळा; या प्रमाणें घ्यावें. पथ्यः—वावडे, उष्ण पदार्थ वर्ज.

३१ त्रिभुवनकीर्तिः—सेवन केल्यानें तेराही प्रकारचे सन्निपातज्वर, हिवज्वर, अग्निमांद्य, कास, अजीर्ण, ज्वर, श्वास इत्यादि ज्वर दूर होतात. घेण्याची रीतीः—सकाळीं, दुपारीं व संध्याकाळीं प्रत्येक वेळीं २ गोळ्या व आल्याचा रस पाव तोळा किंवा अर्धा तोळा, मध ५ थेंब घेणें. किंमत १ तोळ्यास २॥ रु. ट० ख० ६ आणे. पथ्यः—तेलकट, आंबट वर्ज करावें.

३२ राजचंद्रसारः—सेवन केल्यानें सर्व प्रकारचे ज्वर, वात रोग इत्यादि त्वरित शांत होतात. घेण्याची रीतिः—प्रत्येक ३ तासांनीं एक एक गोळी आल्याचा रस अर्धा तोळा व मध ५ थेंब याप्रमाणें द्यावी. किंमत १ तोळ्यास ३ रु. ट० ख० ६ आणे

३३ लघुवातविध्वंसकः—अपस्मार (फेफरें,) उन्माद, सर्वांगवायु, पक्षघातवायु, आमवायु, दांतखिळी व सर्वांगशैत्य इत्यादि रोगांवर. घेण्याची रीतिः—प्रत्येक वेळीं एक गोळी, आल्याचा रस अर्धा तोळा, मध ५ थेंब, तुळशीचा रस ५ थेंब, दिवसांतून ३ वेळा द्यावें किंमत एक तोळ्यास ४ रु. ट० ख० ६ आणे. पथ्यः—तेलकट, वावडें, स्नान वर्ज.

३४. वातगजांकुशः—प्रत्येकवेळीं एक गोळी आल्याचा रस

अर्धा तोळा, मध ५ थेंब तुळशीचा रस ५ थेंब, याप्रमाणें एक करून दिवसांतून ४ वेळां द्यावें ह्मणजे ८० प्रकारचे वायु, उरूस्तंभ इत्यादि हे रोग दूर होतात. एक तोळ्याची किंमत ३ रु. ट० ख ६ आणे. पथ्यः—तेलकट, आंबट, वातूळ व स्नान वर्ज करावे.

**३५. चंद्रप्रभागुटिकाः**—सेवन केल्यानें २० प्रकारचे प्र[illegible] मुत्रकृच्छ्र व मूत्रघात, मुतखडा, प्रमेह पिटिका, पाय फुटतात [illegible] विर्चिका रोग, कुष्ट, गुल्मव्याधी, भगंदर रोग, नेत्ररोग, स्त्रियांचे धुपणी व धातुगत विकार, कंडू इत्यादि रोगांवर घेणें झाल्या दिवसांतून ३ वेळां प्रत्येक वेळीं १ गोळी व १ तोळा तूप, अर्धा तोळा खडीसाखर अर्बुद, वृषण मोठे होतें तो रोग, पांडुरोग, काविळ, हलीमक, अंतर्गळवायु, कमरेचा शुळ, श्वास, कास, कवलु, दंतरोग, अग्निमांद्य, अवढणें व वात, पित्त, कफ, यांचा प्रकोप इत्यादि हे सारे रोग दूर होतात. घेण्याची रीतिः—प्रत्येक वेळीं १ गोळी आल्याचा रस पाव तोळा, मध ५ थेंब हीं दिवसांतून ३ वेळां द्यावीं. पथ्यः—तेलकट, वावडें, आंबट वर्ज करावें. ही चंद्रप्रभाकांती बुद्धी, स्मरणशक्ती व बळ देणारी आहे कि० १ तोळ्यास १ रु. ट० ख० ६ आणे

**३६ लघुमालिनी वसंतः**—कास, जीर्णज्वर, विषमज्वर, रक्तातिसार, प्रदर, नेत्ररोग, पित्तरोग, गलग्रहरोग इत्यादि विकार दूर होतात. घेण्याची रीतिः—प्रत्येक वेळीं १ गोळी मध १० थेंब, पिंपळी १ गुंज याप्रमाणें दिवसांतून ३ वेळां द्यावें. पथ्यः—आंबट, तेलकट वर्ज करावें. एक तोळ्यास किंमत ८ आणे. ट० ख० ६ आ.

**३७ महाज्वरांकुशः**—यानें हिंवज्वर, विषमज्वर, ऐकाहिक, द्व्याहिक, तृतीयक आणि चतुर्थिकज्वर इ० दूर होतात. किंमत तोळ्यास ३ रु. ट० ख० ६ आणे. घेण्याची रीतिः—आल्याचा रस अर्धा तोळा, मध ५ थेंब व गोळ्या दोन याप्रमाणें दिवसांतून ४ वेळां घेणें. पथ्यः—तेलकट, आंबट वर्ज.

**३८ सन्निपातभैरवः**—यानें सन्निपातज्वर, अतिसार, कफ, कुक्षीरोग, (कवलु.) उदावर्त इ० दूर होतात. तो. १ किं. ३ रु. ट० ख० ६ आणे. घेण्याची रीतिः—आल्याचा रस पाव तो. मध ५ थेंब व गोळ्या २ याप्रमाणें दिवसांतून ४ वेळां. पथ्यः—तेलकट, आंबट वर्ज.

३९. **सुवर्णमालिनी वसंतः**—यानें जिर्णज्वर, क्षय, कास, श्वास, शैत्य, मुद्रमयवायु, गुलमा व धातुगतज्वर, रक्तविकार, कृशत्व, बाळरोग (लहान मुलाचे रोग) वृद्धांचे रोग (म्हाताऱ्यांचे रोग) गर्भिणीचे व सुतीकारोग (बाळंत रोग) ई. रोग दूर होतात. तोळा १ किंमत रु. १२ ट० ख० ६ आणे. घेण्याची रीति—दिवसांतून २ वेळां प्रत्येक वेळीं २ तोळे गाईचें दुध, पाव तोळा, खडीसाखर, १ गुंज सुवर्णमालिनी वसंत, याप्रमाणें घ्यावें.
**पथ्यः**—वेलकूट, आंबट, तिखट, वर्ज.

४०. **सुतशेखरः**—मात्रेनें आम्लपित्त, वांती चकर येणें इ० घेण्याची रीति—दोन तोळे गाईचे दुध अर्धा तोळा खडीसाखर व सुतशेखर १ गुंज हीं एकत्र करून दिवसांतून दोन वेळा घ्यावें. पोटशूळ, गुल्म, संग्रहणी, अतिसार, उचकी, क्षय, पित्तवात, अर्धशिशी इ० लिंबाचा रस आल्याचा रस खडीसाखर मध यांतून प्रत्येक वेळीं १ गुंज मात्रा घेत जावी. तोळा १ रु. ४॥ ट. ख. ६ आ.

४१. **अभ्रकभस्मः**—क्षय, श्वास, कास, पंडूरोग इ० १ तोळा किंमत रु. १९ ४२. **प्रवाळभस्मः**—पित्तवात, कडकी, मेह, मूळव्याधी इ० तोळा १ किंमत १ रु. ४३ **शंखभस्मः**—पोटशूळ, गुल्म, कवलु, शैत्य, बद्धकोष्ठ, वात, आल्याचा रस, मध यांतून घेतल्यानें दूर होतात. तोळा १ किंमत ८ आणे.

४४ **बदावरः**—मलमपट्टी लावल्यानें जिरणें व पिकणे लाईक झाला असला तर फुटेल आणि त्यानेच बरा होईल १ डबीची किंमत ८ आणे टपाल ख० ६ आणे.

४५ **चट्यांवर मलमः**—यानें चट्टे व सर्वांगावरील फुटलेली गरमी, डाग व त्वचेचे विकार त्वरीत दूर होतात १ डबीची किं० ८ आणे. टपाल ख० ६ आणे. सूज असून आंत मलम लागू होत नसल्यास हें तेल लावल्यास लवकर गुण येतो. किंमत ८ आणे. टपाल ख० ६ आणे.

४६. गंडमाळा, व्रण व सर्व जखमा मलमपट्टी करून लावल्यानें दूर होतात १ डबीची किंमत ८ आणे. टपाल ख० ६ आणे.

**४७ कुमारी आसवः**—हा सेवन केल्यानें पांच प्रकारचे कास. (खोकले.) तत्संबंधीं वातकास, पित्तकास व कफकास, उदरामध्यें कुठारादिकांनीं प्रहार केल्यासारखी पिडा होणें, ऊरक्षत, कास, धातुक्षय, कासश्वास, (दमा.) क्षुद्रश्वास, तमकश्वास, उर्ध्वश्वास, महाश्वास, छिन्नश्वास क्षयरोग (असाध्य क्षयरोग,) वातक्षय, पित्तक्षय, कफक्षय, सन्निपातक्षय, उरक्षतक्षय, जिर्णज्वर (कढकी.) मेहा, अश्मरी, शुक्रधातु (धातु संबंधी विकार.) अशक्तपणा, आठ प्रकारचीं उदरें, वातोदर, पित्तोदर. कफोदर, त्रिदोषोदर, जलोदर प्लिहोदर, क्षतोदर, बद्धगुदोदर, अर्श (मुळव्याधी मोड व रक्तस्राव,) वातार्श पित्तार्श. कफार्श, सनिपातार्श, रक्तार्श, शसगार्श, आठ प्रकारचे गुल्म, वातगुल्म, पित्तगुल्म, कफगुल्म, वातपित्तगुल्म. पित्तकफगुल्म, कफवातगुल्म, सन्निपातगुल्म, रक्तगुल्म, नळवायु, मळाश्रित वात धरणें वगैरे वातव्याधी, वातपित्तकफादि सर्व वात विकार, अपस्मार (फेंपरें) इत्यादि अनेक रोग दूर होतात; मळशुद्धि होते, अग्निप्रदिप्त होतो, पाचनशक्ती वाढते. पोटशूळ दूर होतो, व नष्टपुष्प इत्यादि रोग बरे होतात; तसेच लहान मुलांचें पंगुत्व, कृमी भरणें, (घोसे) हात, पाय, कंबर ढिली असणें; दुध व अन्न पाचन न होणें, अशक्तपणा इत्यादि रोग बरे होतात. १ बाटली १५ दिवस पुरते. किंमत १। रुपया ट० ख० ८ आणे.

घेण्याची रीतिः—सकाळीं व संध्याकाळीं जेवणाचे पूर्वी घेणाराचे शक्ती प्रमाणें प्रत्येक वेळीं लहान संयेची अर्धीपळी किंवा १ पळीभर किंवा सोयत पाठविलेला चमचाभर औषध सेवन करावें. २ वर्षा-च्या मुलास ५ थेंब. ४ वर्षांच्यास १० थेंब. ६ वर्षांच्यास २० थेंब व ८ व १० वर्षांच्यास ३० थेंब प्रमाणें देणें. पथ्यः—तेल, आंबट, वावडें वर्ज करावें. खुराक पौष्टीक असावें. दुध तूप खाण्यांत यावें.

**४८. सुगंधीक दंतमंजनः**—ही पूड प्रत्यहीं दांतास लावित गेल्यानें हिरड्या फुगणें, ठणका लागणें दंतकृमि; दांतांतून रक्त व पू वहाणें, इत्यादि दंतसंबंधीं त्रासदायक विकार समूळ नाहींसे होऊन दांत स्वच्छ व मजबूत होतात. किंमत १ डबीस ४ आणे. ट० ख० ४ आणे.